स्वीकृत निविदा किंवा करार यानुसार पुरवठाकारांना आगाऊ प्रदाने करण्याबाबत

नियम शिथिलीकरण—

# महाराष्ट्र शासन

## वित्त विभाग

परिपत्रक क्रमांक एमसीई. १०८३/सीआर-७४४/सर्वसाधारण-५
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक १९ जून १९८६

## परिपत्रक

महाराष्ट्र आकस्मिक खर्च नियम, १९६५ यातील (शासकीय अधिसूचना, वित्त विभाग, क्रमांक एमसीई. १०८३/सीआर-७४४/सर्वसाधारण-५, दिनांक १४ मार्च १९८४ याद्वारे समाविष्ट करण्यात आलेला) नियम १७६-अ यानुसार पुरवठाकाराला स्वीकृत निविदेनुसार किंवा विभागप्रमुखांच्या दर्जापेक्षा कमी दर्जा नसलेल्या अधिकाऱ्याने पुरवठाकार व शासन यांच्यामध्ये केलेल्या करारानुसार आगाऊ रक्कम देऊ शकतात. कोषागारास आवश्यक रकमेचे आकस्मिक खर्चाचे संक्षिप्त बिल सादर करणारा अधिकारी, मालाचा अपुरा पुरवठा, सदोष पुरवठा किंवा उशिरा पुरवठा झाल्यास त्याप्रसंगी होणाऱ्या कोणत्याही हानीपासून शासनाला प्रतिभूत करण्यासाठी पुरेशी खबरदारी घेण्यात आली आहे. या आशयाच्या खालील प्रमाणपत्रासह पुरवठाकाराकडून मिळविलेले प्रपत्रबिजकदेखील सादर करील :—

"प्रमाणित करण्यात येते की, मालाचा अपुरा पुरवठा होईल, पुरवठा होणार नाही, सदोष पुरवठा होईल किंवा उशिरा पुरवठा होईल त्याप्रसंगी होणाऱ्या कोणत्याही हानीपासून शासनाला प्रतिभूत करण्यासाठी व शासनाची क्षतिपूर्ती करण्यासाठी बीजक क्रमांक , दिनांक अन्वये पुरवठाकाराकडून रु. इतक्या आवश्यक रकमेची बँक हमी/किंवा वचनचिठ्ठी मिळविण्यात आलेली आहे."

२. मध्यवर्ती भांडार खरेदी अधिकारी/महासंचालक, पुरवठा व विनियोग, यांच्याबरोबर दर संविदा करणाऱ्या संबंधित व्यक्तींकडून खरेदी केलेल्या भांडारवस्तूंच्या संबंधात, नियम १७६-अच्या तरतुदी योग्य त्या फेरफारासह लागू करण्यायोग्य आहेत किंवा कसे असा प्रश्न उपस्थित झालेला आहे. या बाबींवर विचारविमर्श होऊन आता असा खुलासा करीत आहे की, मध्यवर्ती भांडार खरेदी अधिकारी/महासंचालक, पुरवठा व विनियोग यांच्याबरोबर दर संविदा केलेल्या संबंधित व्यक्तींकडून खरेदी केलेल्या भांडारवस्तूंच्या नियम १७६-अ मध्ये विहीत केलेले प्रमाणपत्र सादर करण्यासंबंधीच्या तरतुदी लागू करण्यात येणार नाहीत. अशा प्रकरणांमध्ये आवश्यक असल्यास, संक्षिप्त बिलांद्वारे रक्कम काढून घेऊन आगाऊ प्रदाने करता येतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,
**च. रा. आजगांवकर,**
उप सचिव,
महाराष्ट्र शासन, वित्त विभाग.

प्रति

महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई (८० प्रती),
महालेखापाल, महाराष्ट्र-१, (लेखा परीक्षा), मुंबई (८० प्रती),
महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता), नागपूर (४० प्रती),
महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा परीक्षा), नागपूर (४० प्रती),
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई (४० प्रती),
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई,
वरिष्ठ उप संचालक, वाणिज्य लेखा परीक्षा, राज्य परिवहन मंडळ, वाहतूक भवन, मुंबई ४०० ००८.
राज्यपालांचे सचिव,
मुख्य मंत्र्यांचे/राज्यमंत्र्यांचे स्वीय सहायक,
*प्रबंधक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई.
*प्रबंधक, अपिल शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
*सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
*सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
*प्रबंधक लोकायुक्त व उप लोकायुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
मंत्रालयाच्या निरनिराळ्या विभागांच्या अधीन असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख,
मंत्रालयाचे सर्व विभाग/सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
संपर्क अधिकारी, मंत्रालय, मुंबई,
वित्त विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती, कार्यासन जीईएन-५, वित्त विभाग.

*पत्राने.

(शा.म.मु.) एच ११३३ (१०,००४—७–८६)

*Advance payments to be made to the Suppliers in terms of an accepted tender or agreement.*

*Relaxation of—*

GOVERNMENT OF MAHARASHTRA

FINANCE DEPARTMENT

Circular No. MCE. 1083/CR-744/GEN-5,

Mantralaya, Bombay 400 032, dated the 19th June, 1986

*CIRCULAR*

According to Rule 176-A of the Maharashtra Contingent Expenditure Rules, 1965 (inserted *vide* Government Notification, Finance Department, No. MCE. 1083/CR-744/GEN-5, dated 14th March 1984) an advance payment is to be made to the supplier in terms of an Accepted Tender or the agreement made by an officer not below the rank of the Head of the Department between the supplier and the Government Department. The officer presenting an Abstract Contingent Bill for the requisite amount to the Treasury, shall also furnish proforma invoice obtained from the supplier together with the following certificate that adequate safeguards have been taken to secure Government against any loss in the event of short supply, defective supply or delayed supply of the Materials:—

" Certified that the bank guarantee for the requisite amount/or a promissory note for the requisite amount of Rs. .......... has been obtained from the supplier to indemnify and to secure Government against any loss in the event of short supply, non-supply, defective supply or delayed supply of the materials made *vide* Invoice No......., ............ dated ........................ ".

2. A question has arisen as to whether the provisions of Rule 176-A are applicable *mutatis-mutandis* in respect of the stores purchased from the parties who are on rate contract with the Central Stores Purchasing Officer/Director General of Supplies and Disposals. The matter has been considered and Government is now pleased to clarify that these provisions of furnishing proforma invoice and certificate prescribed in Rule 176-A will not be made applicable to the Stores purchased from the parties, who are on rate contract with the Central Stores Purchasing Officer/Director General of Supplies and Disposals. Advance payments in such cases may be made by drawal of the amount on Abstract bills, if required.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

C. R. AJGAONKAR,
Deputy Secretary to Government,
Finance Department.

To

The Accountant General-I, Maharashtra (Accounts and Entitle ment) Bombay (80 copies),
The Accountant General-I, Maharashtra (Audit), Bombay (80 copies),
The Accountant General, Maharashtra (Accounts and Entitlement), Nagpur (40 copies),
The Accountant General-II, Maharashtra (Audit), Nagpur (40 copies).

(As in Marathi Version)